जिल्हा परिषदेतील ग्रामीण पाणीपुरवठा विभागातील पदवीधर कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना उपअभियंता (स्थापत्य) पदावर दिलेली पदोन्नती रद्द करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः जिपग्रा-१२२४/प्र.क्र.१३७/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: ०३ जुलै, २०२४.

**वाचा:**

१) शासन आदेश, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक मजीप्रा-१२२३/प्र.क्र.१३९/पापु-२३, दि.२५.०१.२०२४

२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ यांच पत्र क्रमांक मजीप्रा-यजिप/पापुवि/आस्था/६४४/२४, दि.१८.०३.२०२४

### -: शासन आदेश:-

जिल्हा परिषदांमधील ग्रामीण पाणीपुरवठा विभाग/उपविभाग येथे कार्यरत असलेल्या जिल्हा तांत्रिक सेवा (वर्ग-३) मधील ४९ पदवीधर कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना संदर्भाधीन (१) येथील आदेशान्वये सन २०२२-२३ च्या अतिरिक्त निवडसूचीमधनू, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवर, जिल्हा परिषद कोट्यातून उपअभियंता (स्था.) (गट-अ) या पदावर, वेतनस्तर एस-२०, ५६१००-१७७६०० या वेतन श्रेणीमध्ये, तात्पुरती पदोन्नती देण्यात आली आहे. तथापि या आदेशातील अ.क्र. (४७) येथील श्री. एस. डी. सोनी (ज्येष्ठता क्र.१२८) यांनी पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात नाकारली असल्याचे कार्यकारी अभियंता (ग्रापापु), जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी संदर्भाधीन (२) येथील पत्रान्वये कळविले आहे. त्यानुषंगाने श्री. एस. डी. सोनी यांना संदर्भाधीन (१) येथील आदेशान्वये उपअभियंता (स्थापत्य) या पदावर दिलेली पदोन्नती रद्द करण्यात येत असून सन २०२२-२३ च्या निवडसूचीतून त्यांचे नाव वगळण्यात येत आहे.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ मधील तरतूदी विचारात घेऊन श्री. सोनी यांचा पुढील दोन वर्षांच्या निवडसूचीमध्ये पदोन्नतीसाठी विचार करु नये. तसेच त्यांना आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात येऊ नये, यापूर्वी सदर लाभ दिला असल्यास तो काढून घेण्यासंदर्भात वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार जिल्हा परिषदेने कार्यवाही करावी.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०३१५१५०४४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHE
B B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2024.07.03 15:51:54 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
३. सर्व सहसचिव/उपसचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ.
८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ
९. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
१०. सर्व मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

११.श्री. एस. डी. सोनी, सहायक अभियंता (श्रेणी-२), ग्रामीण पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ (कार्यकारी अभियंता यांच्यामार्फत).

१२.कार्यासन आस्था-४, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.

१३. कार्यासन, १२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रत:- १) मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.

३) निवडनस्ती, पापु-२३